**<u>महिला व बाल विकास विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या शासकीय योजनांचे लाभ (Direct Benefit Transfer) थेट लाभार्थ्यांपर्यंत पोहचविण्यासाठी कार्यप्रणाली अंमलात आणण्यासाठी समिती स्थापन करणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आस्था-२०१७/प्र.क्र.१२/का.१**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ एप्रिल, २०१७.

<u>वाचा :-</u> सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान),
शासन निर्णय क्रमांक साप्रवि-मातंस-०५४/३१/२०१६/का-३९, दिनांक १६ सप्टेंबर, २०१६.

<u>प्रस्तावना :-</u>

शासकीय योजनांचे लाभ थेट लाभार्थ्यांना त्यांच्या बँक खात्यात हस्तांतरीत करण्याच्या अनुषंगाने विभागांना मार्गदर्शन करण्यासाठी सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान) यांनी दिनांक १६ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये **<u>राज्यस्तरीय समिती गठीत</u>** केलेली आहे.

सदर समितीच्या मार्गदर्शनाखाली महिला व बाल विकास विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांचे लाभ (Direct Benefit Transfer ) व्दारे लाभार्थ्यांपर्यंत पोहचविण्यासाठी योजना निश्चित करुन त्याप्रमाणे कार्यप्रणाली अंमलात आणण्यासाठी **<u>विभागांतर्गत समिती स्थापन</u>** करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय:-</u>

महिला व बाल विकास विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या शासकीय योजनांचे लाभ थेट लाभार्थ्यांना त्यांच्या बँक खात्यात हस्तांतरीत करण्यासाठी विभागातील योजना निश्चित करुन सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान) यांनी दिनांक १६ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या **<u>राज्यस्तरीय समितीसमोर मार्गदर्शनासाठी</u>** खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | पदनाम | समितीवरील पद |
|---|---|---|
| १ | उप सचिव (आस्था) | अध्यक्ष |
| २ | उप सचिव (श्रीमती निवतकर) | सदस्य |
| ३ | श्री. नविन गोडसे,<br>सल्लागार KPMG कंपनी प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | कक्ष अधिकारी/अवर सचिव (का-६) | सदस्य सचिव |

उपरोक्त समितीस त्यांच्या कामात विभागातील **श्री रमेश वामन सरफरे,सहाय्यक कक्ष अधिकारी** (का-६) हे पुर्णपणे सहाय्य करतील. केंद्र शासनाने शासकीय योजनांचे लाभ थेट लाभार्थ्यांना त्यांच्या बँक खात्यात हस्तांतरणा (Direct Benefit Transfer ) व्दारे लाभार्थ्यांपर्यंत पोहचविण्याची कार्यपध्दती सन २०१७ पर्यंत कार्यान्वित करण्याबाबत सूचित केलेले आहे. त्यामुळे उपरोक्त गठीत समितीने योजना निश्चित करुन त्याचा अहवाल सचिव (म.व बा.वि.) यांना तातडीने सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२७११३१२१२२३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.04.27 11:34:12 +05'30'

**( ला.रा.गुजर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२.मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३.मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४.मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्य.
५.सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६.अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग)मंत्रालय,मुंबई.
७.अपर मुख्य सचिव (महिला व बाल कल्याण विभाग), मंत्रालय, मुंबई.
८.प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.
९.आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई.
११.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१२. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास.
१३.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, आयुक्त, महिला व बाल विकास पुणे, मार्फत.
१४.सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी ) आयुक्त,(ए.बा.वि.से.यो.) बेलापूर,मार्फत.
१५.सर्व मंत्रालयीन विभाग.
१६.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
१७.सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण), जिल्हा परिषद.
१८.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९.निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई.
२०.महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने.
२१.निवड नस्ती (कार्यासन १).